**महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई अंतर्गत नोंदित बांधकाम कामगारांना निवृत्तीवेतन लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग

शासन निर्णय क्रमांक:- इबांका-०३२५/प्र.क्र.४५/कामगार - ७

मंत्रालय मुंबई - ४०० ०३२

दिनांक: २८ मार्च, २०२५.

**संदर्भ:-**

१. केंद्रिय श्रम व रोजगार मंत्रालयाचे पत्र क्रमांक झेड-२००१२/०९/२०१८-बी.एल., दिनांक २५ सप्टेंबर,२०१८.
२. महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई यांची बैठक क्र. ६२, दिनांक २६ मार्च, २०२५ मधील ठराव क्र.०२
३. महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई यांचे पत्र क्रमांक ६९५/२०२५/पेन्शन-२०२५/प्र.क्र.१०७/योजना-०६, दिनांक २७ मार्च,२०२५.

**प्रस्तावना** : -

इमारत व इतर बांधकाम व्यवसायामधील कामगारांच्या हिताचे रक्षण करण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार नियमन व सेवाशर्ती) अधिनियम, १९९६ लागू केला आहे. त्याअनुषंगाने महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार नियमन व सेवाशर्ती) नियम, २००७ अस्तित्वात आले आहेत. सदर नियमांच्या अनुषंगाने महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाची स्थापना करण्यात आलेली आहे.

वयाची १८ वर्षे पुर्ण झालेल्या ते वयाच्या ६० वर्षापर्यंतच्या बांधकाम कामगाराने मागील एक वर्षात किमान ९० दिवस काम केले असल्यास, मंडळाकडे नोंदित करून घेतले जाते व त्याच्या नोंदणीचे दरवर्षी त्यास नुतनीकरण करावे लागते. संबधित बांधकाम कामगारास त्याच्या सक्रिय (जिवीत) नोंदणी कालावधीत मंडळाच्या विविध योजनेचे लाभ देण्यात येतात.

इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार नियमन व सेवाशर्ती) अधिनियम, १९९६ च्या कलम (२२) (ब) मध्ये वयाची ६० वर्षे पुर्ण झालेल्या बांधकाम कामगारांना निवृत्तीवेतन देण्याची तरतूद आहे. याबाबत केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र. १ अन्वये आदर्श कल्याणकारी योजनांची मार्गदर्शक तत्वे विषद केली आहेत. त्याअनुषंगाने मंडळाच्या दिनांक २६.०३.२०२५ रोजीच्या ६२ व्या बैठकीत मंडळांतर्गत नोंदीत बांधकाम कामगारांना निवृत्तीवेतन लागू करण्याबाबतचा ठराव पारित करण्यात आला असून याबाबत

मा.मंत्री (कामगार) यांनी महाराष्ट्र विधानमंडळाच्या अर्थसंकल्पियअधिवेशनामध्ये विधानसभा आणि विधानपरिषद या दोन्ही सभागृहांमध्ये प्रस्तुत प्रकरणासंदर्भातील निवेदन सादर केले आहे. त्यानुषंगाने मंडळाने त्यांच्या संदर्भाधीन क्र. ०३ च्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

वयाची ६० वर्षे पुर्ण झाल्यानंतर बांधकाम कामगाराची मंडळाकडे नोंदणी होत नाही व त्याच्या पुर्वीच्या नोंदणीचे नुतणीकरणही होत नाही. त्यामुळे मंडळाकडून मिळणाऱ्या विविध योजनांपासून कामगार वंचित राहतो. अशावेळी त्यांच्या वृद्धापकाळात त्यांचे जीवन सुखकर होण्याकरीता हातभार लावण्याच्या दृष्टीने, बांधकाम कामगांराना निवृत्तीवेतन लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई अंतर्गत नोंदित बांधकाम कामगारांनी त्यांच्या वयाची ६० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना निवृत्तीवेतन लागू करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**२. पात्रतेचे निकष :-**

(अ) वयाची ६० वर्षे पुर्ण केलेली व मंडळाकडे नोंदित असलेले सर्व बांधकाम कामगार सदर योजनेअंतर्गत पात्र राहतील. तसेच त्याच्या कुटुंबातील पती व पत्नी दोघेही बांधकाम कामगार असतील तर ते स्वतंत्रपणे पात्र राहतील.

(ब) पती/पत्नी च्या मृत्यूनंतर संबधित बांधकाम कामगाराचे पती/पत्नी निवृत्तीवेतनाकरिता पात्र राहतील. तथापि, पती/पत्नी सदर योजनेअंतर्गत निवृत्तीवेतन मिळत असेल तर संबधितास दुबार निवृत्तीवेतनाचा लाभ मिळणार नाही.

(क) केंद्र शासनाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील आदर्श कल्याणकारी योजनांच्या मार्गदर्शक तत्वानुसार, कर्मचारी राज्य विमा कायदा, १९४८ (Employees State Insurance Act, १९४८) व कर्मचा-यांचे प्रदाता निधी आणि विविध तरतूदी कायदा, १९५२ (The Employees Provident Fund and Miscellaneous Provision Act, १९५२) अंतर्गत लाभ प्राप्त करणारे बांधकाम कामगार निवृत्तीवेतनास पात्र राहणार नाहीत.

**३. वित्तीय निकष :-**

(अ) पात्र बांधकाम कामगारांना त्यांच्या मंडळाकडील नोंदणीच्या कालावधीनुसार निवृत्तीवेतन अदा करण्यात येईल.

(ब) मंडळाकडे नोंदणी असलेल्या वर्षानुसार निवृत्तीवेतनाचे प्रमाण खालीलप्रमाणे राहील :-

| **अ.क्र.** | **मंडळाकडे नोंदणीची एकूण वर्षे** | **दरवर्षी मिळणारे निवृत्तीवेतन** |
|---|---|---|
| १ | १० वर्षे | ५०% (रू.६,०००/-) |

| | | |
|---|---|---|
| २ | १५ वर्षे | ७५%(रू.९,०००/-) |
| ३ | २० वर्षे | १००% (रू.१२,०००/-) |

(क) सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च मंडळाकडे जमा होणा-या कामगार उपकरामधून भागविण्यात येईल.

**(ड)** मंडळाकडे जमा होणा-या कामगार उपकराचा आढावा घेवून, सदर निवृत्तीवेतनामध्ये कमी अथवा वाढ करणे, अटी व शर्तीमध्ये बदल करणे याबाबत निर्णय मंडळ मान्यतेअंती शासन स्तरावर घेण्यात येईल.

**४. निवृत्तीवेतनाकरिता मंजूर करण्याची कार्यपद्धती :-**

(अ) सदर योजनेअंतर्गत पात्र ठरणाऱ्या बांधकाम कामगाराने https://mahabocw.in/ या संकेतस्थळावरील अर्ज विनामूल्य प्राप्त (Download) करून घ्यावा. (अर्जाचा नमूना “प्रपत्र-अ” प्रमाणे)

(ब) सदरचा अर्ज पूर्णपणे भरून बांधकाम कामगाराने त्याचे आधार कार्ड ज्या जिल्ह्यामधील आहे त्या जिल्हा इमारत कामगार सुविधा केंद्राचे प्रभारी (कामगार उपायुक्त/सहायक कामगार आयुक्त/सरकारी कामगार अधिकारी) यांच्याकडे जमा करावा.

(क) संबधित प्रभारी, जिल्हा इमारत कामगार सुविधा केंद्र यांनी सदर अर्जाची छानणी करून **“निवृत्तीवेतन शिफारस प्रमाणपत्र”** (प्रपत्र-ब) सह प्रस्ताव मंडळ मान्यतेस सादर करावा. एकापेक्षा जास्त जिल्ह्यामध्ये नोंदणी/नुतनीकरणाचा कालावधी असल्यास संबधित जिह्यामधून **“वर्षनिहाय नोंदणी प्रमाणपत्र”** (प्रपत्र-क) संबधित प्रभारी, जिल्हा इमारत कामगार सुविधा केंद्र यांनी प्राप्त करून घ्यावे.

(ड) मंडळ स्तरावर सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या मान्यतेअंती संबधित बांधकाम कामगारास **“निवृत्तीवेतन क्रमांक प्रमाणपत्र”** देण्यात येईल. (प्रपत्र-ड)

(इ) निवृत्तीवेतन क्रमांक प्रमाणपत्र दिल्याचा दिनांक हा संबधित बांधकाम कामगाराचा निवृत्तीवेतन दिनांक समजण्यात येईल व त्यानुसार वर्ष गणना करण्यात येईल.

(ई) दरवर्षी बांधकाम कामगारास त्याच्या हयातीचा पुरावा मंडळाकडे सादर करावा लागेल जेणेकरून, त्या वर्षीचे निवृत्तीवेतन त्याच्या खात्यात जमा करता येईल.

(क) बांधकाम कामगारास त्याचे बँक खाते बदलावयाचे असल्यास तसा अर्ज त्यास प्रभारी, जिल्हा इमारत कामगार सुविधा केंद्रामार्फत मंडळास करावा लागेल.

(ख) बांधकाम कामगाराचा मृत्यू झाल्यास, त्याचा/तीचा वारसदार पती/पत्नीने वारस नोंदीचा अर्ज प्रभारी, जिल्हा इमारत कामगार सुविधा केंद्रामार्फत मंडळास करावा लागेल.

(ग) सदर निवृत्तीवेतन क्रमांकाची नोंद एकात्मिक कल्याणकारी मंडळ संगणकीय प्रणाली (IWBMS) या प्रणालीवर घेण्यात येईल व संबधित बांधकाम कामगाराच्या खात्यावर निवृत्तीवेतन जमा करण्यात येईल.

(घ) सदर योजनेबाबत आवश्यकतेनुसार सविस्तर कार्यपद्धती निश्चित करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

**५.** सदरची योजना महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई मार्फत राबविण्यात येईल. त्याचप्रमाणे सदर योजना राबविण्याबाबतचा कोणताही आर्थिक भार शासनावर राहणार नाही. सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सदर योजना अंमलबजावणीबाबत आवश्यक ती उचित कार्यवाही मंडळ स्तरावरुन करण्यात यावी.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२८१९२३१४४७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK UTTAMRAO POKALE

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=856b31c793b12e4f22cb247c5cff7f3358867f2482aa2234f6131bf8940dbd2e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F4163205E7B4960CC7CA6F973D6DEB06502B2E8FC47A411BABCF42A0E99CF34B, cn=DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2025.03.28 19:24:22 +05'30'

**(दिपक पोकळे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई.
२. मा.सभापती, महाराषट्र विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा , विधानमंडळ, मुंबई.
४. सर्व विधीमंडळ सदस्य
५. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, विधानमंडळ, मुंबई.
७. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय,मुंबई.
८. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव, मुंबई.
११. विकास आयुक्त, असंघटीत कामगार, मुंबई.
१२. कामगार आयुक्त , महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रलय, मुंबई.
१४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५. सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराषट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई.
१६. निवड नस्ती.

# प्रपत्र-अ

## बांधकाम कामगार निवृत्तीवेतन अर्ज

१. बांधकाम कामगाराचे नाव :-

२. बांधकाम कामगाराचा नोंदणी क्रमांक:-

३. आधार क्रमांक:-

४. जन्मदिनांक:-

५. वयाची ६० वर्षे पूर्ण झाल्याचा दिनांक:-

६. प्रथम नोंदणी झाल्याचा दिनांक:-

७. प्रथम नोंदणी झालेल्या जिल्ह्याचे ठीकाण:-

८. नोंदणी कालावधीचा तपशिल:-

| **अ.क्र.** | **नोंदणी / नुतनीकरणाचा दिनांक** | **नोंदणी / नुतनीकरणाचा कालावधी** | **जिल्हा** |
|---|---|---|---|
| १ | दि.-------- | दि. ------ ते दि. --------- | |
| २ | दि.-------- | दि. ------ ते दि. --------- | |
| ३ | दि.-------- | दि. ------ ते दि. --------- | |
| ४ | दि.-------- | दि. ------ ते दि. --------- | |
| ५ | दि.-------- | दि. ------ ते दि. --------- | |

९. बँक खात्याचा तपशिल :-

(अ) बँकेचे नाव -

(ब) खाते क्रमांक -

(क) आय.एफ.एस.सी. क्रमांक -

१०. कर्मचारी राज्य विमा कायदा,१९४८ (Employees State Insurance Act,१९४८) अंतर्गत लाभ घेण्यात येतो का ? (होय/नाही) :-

११. कर्मचा-यांचे प्रदाता निधी आणि विविध तरतूदी कायदा, १९५२ (The Employees Provident Fund and Miscellaneous Provision Act,१९५२) अंतर्गत लाभ घेण्यात येतो का ? (होय/नाही) :-

उपरोक्त प्रमाणे सादर करण्यात आलेली माहीती सत्य असून, खोटी आढळून आल्यास नियमानुसार माझ्याविरूद्धच्या उचित कारवाईस पात्र असेन याची मला जाणीव आहे.

**(बांधकाम कामगाराचे नाव)**

# प्रपत्र-ब

## -: निवृत्तीवेतन शिफारस प्रमाणपत्र :-

प्रमाणित करण्यात येते की, श्री./श्रीमती ---------------,नोंदणी क्रमांक ---------हे महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई अंतर्गत ------- वर्षे नोंदित होते. त्यांनी वयाची ६० वर्षे दिनांक ------ रोजी पूर्ण केली असून, त्यांना कर्मचारी राज्य विमा कायदा,१९४८ (Employees State Insurance Act,१९४८) व कर्मचा-यांचे प्रदाता निधी आणि विविध तरतूदी कायदा, १९५२ (The Employees Provident Fund and Miscellaneous Provision Act,१९५२) अंतर्गत लाभ प्राप्त होत नाही. निकषानुसार ते दरवर्षी रक्कम रू. ------ (--%) निवृत्तीवेतनास पात्र आहेत.

प्रभारी
(कामगार उपायुक्त/सहायक कामगार आयुक्त/
सरकारी कामगार अधिकारी)
जिल्हा इमारत कामगार सुविधा केंद्र
जिल्हा -----

# <u>प्रपत्र-क</u>

## <u>-: वर्षनिहाय नोंदणी प्रमाणपत्र :-</u>

प्रमाणित करण्यात येते की, श्री./श्रीमती ---------------, नोंदणी क्रमांक ---------हे जिल्हा इमारत कामगार सुविधा केंद्र ------ अंतर्गत दिनांक ---- ते दिनांक --- अखेर नोंदित होते.

प्रभारी<br>
(कामगार उपायुक्त/सहायक कामगार आयुक्त/<br>
सरकारी कामगार अधिकारी)<br>
जिल्हा इमारत कामगार सुविधा केंद्र<br>
जिल्हा -----

## प्रपत्र-ड

## -: निवृत्तीवेतन क्रमांक प्रमाणपत्र:-

प्रमाणित करण्यात येते की, श्री./श्रीमती ---------------,नोंदणी क्रमांक ---------हे महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई अंतर्गत ------- वर्षे नोंदित होते. त्यांनी वयाची ६० वर्षे दिनांक ------ रोजी पूर्ण केली असून, त्यांना कर्मचारी राज्य विमा कायदा,१९४८ (Employees State Insurance Act, १९४८) व कर्मचा-यांचे प्रदाता निधी आणि विविध तरतूदी कायदा, १९५२ (The Employees Provident Fund and Miscellaneous Provision Act, १९५२) अंतर्गत लाभ प्राप्त होत नाही. निकषानुसार ते दरवर्षी रक्कम रू. ------ (--%) निवृत्तीवेतनास पात्र आहेत. त्यांना दिनांक ------- पासून निवृत्तीवेतनास पात्र ठरविण्यात येत असून, त्यांता निवृत्तीवेतन क्रमांक------- हा राहील.

(लेखा अधिकारी)
महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई